दिनांक २६.११.२००८ रोजी अतिरेक्यांनी केलेल्या मुंबई हल्ल्याप्रकरणी सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल अपिल प्रकरणी शासनातर्फे विशेष समुपदेशी म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या वरीष्ठ ॲड.श्री. गोपाल सुब्रम्हण्यम यांना व्यावसायिक फी मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. एसपीपी २०११/प्र.क्र.२४२/पोल-१०

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : २६ ऑगस्ट, २०११.

संदर्भ :- विधी व न्याय विभागाचे क्र.७०/क्रिम/जन/११/अ शाखा, दि.६.८.२०११ चे पत्र.

**शासन निर्णय** :- दिनांक २६.११.२००८ रोजी अतिरेक्यांनी केलेल्या मुंबई हल्ल्यातील दोषसिध्द आरोपी अजमल आमीर कसाब याने उच्च न्यायालयाने दिलेल्या शिक्षेविरुद्ध दाखल केलेले अपिल तसेच, दोन आरोपितांना दोषमुक्त केल्याप्रकरणी महाराष्ट्र शासनाच्या वतीने दाखल करण्यात आलेल्या अपील प्रकरणी महाराष्ट्र शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी वरीष्ठ ॲड.श्री. गोपाल सुब्रम्हण्यम व त्यांच्या सोबत ॲड.श्री. उज्वल निकम यांच्या विशेष समुपदेशी म्हणून सेवा उपलब्ध करुन घेण्याबाबत विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक ६.८.२०११ च्या पत्रान्वये श्री.एस.व्ही.खर्डे, प्रभारी सरकारी अधिवक्ता, सर्वोच्च न्यायालय, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली यांना विनंती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी वरीष्ठ ॲड.श्री. गोपाल सुब्रम्हण्यम यांना खालीलप्रमाणे फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

ॲड.श्री. गोपाल सुब्रम्हण्यम :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | एकूण एकत्रित फी | - | रू.१/- |
| २) | इतर खर्च | - | प्रत्यक्षाप्रमाणे. |

२. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस .. आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी

विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर- ४७७/११/व्यय-७, दिनांक ११.८.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८२६११२४४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
- विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली.
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
- अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
- श्री.एस.व्ही.खर्डे, प्रभारी सरकारी अधिवक्ता, सर्वोच्च न्यायालय, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली.
- उप सचिव, उपमुख्यमंत्र्यांचे कार्यालय.
- वरीष्ठ वकील श्री. गोपाल सुब्रम्हण्यम, बी-५/७, सफदरजंग एन्क्लेव्ह, आफ्रिका एव्हेन्यू, नवी दिल्ली-१११ ०२९
- ॲड.श्री. उज्वल निकम, ४८ रामदास कॉलनी, बॅरिस्टर निकम चौक, जळगाव.
- विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
- सामान्य प्रशासन विभाग (२०अ), मंत्रालय, मुंबई.
- निवड नस्ती (पोल-१०)